20101231183155001

**महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियान व महाराष्ट्र सुजल निर्मल अभियान या योजनांच्या कार्यकक्षा विहित करण्याबाबत.**

---

महाराष्ट्र शासन,
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.नगरो-२०१०/प्र.क्र.२४०/नवि-३३,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक ३० ऑक्टोबर २०१०.

संदर्भ:- १) शासन निर्णय क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२, दि.२२.१०.२००८.
२) शासन निर्णय क्र.एनयुआर-२००८/प्र.क्र.२०३/नवि-३३,दि.२०.०२.२०१०.

<u>प्रस्तावना</u>:-

सुधारणात्मक उपाय योजनांशी निगडीत नागरी पाणी पुरवठा व मल:निस्सारण प्रकल्पांना अर्थसहाय्य करण्याच्या दृष्टीने शासनाने संदर्भाधीन क्रमांक १ वरील शासन निर्णयान्वये **महाराष्ट्र सुजल निर्मल अभियान** सुरु केले आहे. त्याचप्रमाणे राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना विविध प्रकारच्या नागरी पायाभूत सुविधा विकास प्रकल्पांकरीता अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने शासनाने संदर्भक्रमांक २ वरील शासन निर्णयान्वये **महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियान** राबविण्याचा निर्णय घेतला आहे. सदर महाअभियानांतर्गत ज्या प्रकारच्या नागरी पायाभूत सुविधांसंबंधी प्रकल्प घेणे अनुज्ञेय आहे त्यामध्ये पाणीपुरवठा व स्वच्छताविषयक प्रकल्पांचादेखील समावेश आहे. संदर्भ क्रमांक २ वरील शासन निर्णयामध्ये असे स्पष्टपणे नमूद केले आहे की, *महाराष्ट्र सुजल निर्मल अभियान या योजनेअंतर्गत कोणत्याही कारणास्तव विचार होऊ न शकणा-या पाणी पुरवठा व मल:निस्सारण प्रकल्पांचाच विचार महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानाअंतर्गत अर्थसहाय्यासाठी करण्यात येईल* . असे असतांनाही नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये काही वेळा पाणीपुरवठा व स्वच्छताविषयक प्रकल्पांकरीता नगर विकास विभाग आणि पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांच्यापैकी कोणत्या विभागाकडे कोणत्या योजनेखाली आवेदन करावे याबाबत संभ्रम असल्याचे दिसून आले आहे. त्यामुळे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने कोणत्या परिस्थितीत पाणी पुरवठा/मल:निस्सारण/स्वच्छता विषयक प्रकल्पांकरीता अर्थसहाय्यासाठी कोणत्या विभागाकडे संपर्क साधावा, हे अधिक स्पष्ट करणे आवश्यक आहे. या विषयी सर्वंकष विचार करुन शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

<u>शासन निर्णय</u>:-

महाराष्ट्र सुजल निर्मल अभियानात प्रामुख्याने सुधारणात्मक उपाय योजनांशी निगडीत नागरी पाणीपुरवठा व मल:निस्सारण योजनांचा विचार करण्यात येत आहे व महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानात पहिल्या टप्प्यामध्ये निवडक ८२ शहरांच्याच प्रकल्पांकरीता अर्थसहाय्य उपलब्ध होणार आहे. हे लक्षात घेऊन या दोन अभियानांच्या कार्यकक्षा पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत: -

(i) महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानाच्या पहिल्या टप्प्यात समाविष्ट ८२ शहरांव्यतिरिक्त सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी पाणीपुरवठा, मल:निस्सारण व स्वच्छताविषयक प्रकल्पांकरीता अर्थसहाय्य मिळण्यासाठी प्रस्ताव पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाकडे महाराष्ट्र सुजल निर्मल अभियानांतर्गत सादर करावे.

(ii) महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानात समाविष्ट ८२ शहरांच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी पाणीपुरवठा, मल:निस्सारण व स्वच्छताविषयक प्रकल्पांसंदर्भात पुढीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरावी .

(अ) पाणीपुरवठा, मल:निस्सारण व स्वच्छता विषयक असे भांडवली स्वरुपाचे प्रकल्प की, ज्यामध्ये मालमत्तांची निर्मिती होईल ( उदा. ज्या प्रकल्पात नवीन जलस्त्रोत तयार करणे, जलस्त्रोतांचे संवर्धन करणे, नवीन वितरण व्यवस्था /जलकुंभ निर्माण करणे इत्यादींचा समावेश असेल) अशा प्रकल्पांकरीता नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाअभियानांतर्गत नगर विकास विभागाकडे संपर्क साधावा.

(ब) पाणीपुरवठा, मल:निस्सारण व स्वच्छता क्षेत्रातील सुधारणात्मक उपाय योजनांशी निगडीत प्रकल्प (उदा. गैरमहसूली पाण्यांचे प्रमाण कमी करणे, वितरण व्यवस्था बदलणे अथवा त्यात सुधारणा करणे, जलमापके बसविणे, पाणी लेखापरिक्षण /उर्जा लेखापरिक्षण / हायड्रॉलिक मॉडेलिंग करणे इत्यादी ) यांच्यासाठी वर उल्लेखित ८२ शहरांच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी प्रथम पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाकडे महाराष्ट्र सुजल निर्मल अभियानांतर्गत संपर्क साधावा.

तथापी अश्या पाणीपुरवठा, मल:निस्सारण व स्वच्छता क्षेत्रातील सुधारणात्मक प्रकल्पास जर कोणत्याही कारणास्तव महाराष्ट्र सुजल निर्मल अभियानांतर्गत अर्थसहाय्य मिळू शकत नसेल आणि पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाने त्या प्रकल्पाची शिफारस नगर विकास विभागाकडे केली तर अशा प्रकल्पाचा देखील विचार महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत अर्थसहाय्यासाठी करता येईल.

(iii) एखादया प्रकरणी कोणत्या अभियानात एखादा प्रकल्प घ्यावा याबाबत नगर विकास विभाग आणि पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग या दोन विभागात मतैक्य होत नसेल तर अशा प्रकरणी मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) व मा.मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने निर्णय घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( मनु कुमार श्रीवास्तव )
सचिव, नगर विकास विभाग.

प्रत,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव

CR240 GRF:

मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे , मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, (फोर्ट), मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लिमिटेड
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लिमिटेड
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
आयुक्त व संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
सह सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, सर्व महानगरपालिका/ मुख्याधिकारी सर्व नगरपरिषदा
निवडनस्ती (नवि-३३)

--------